जनगणना २०११ च्या कामासाठी प्राप्त झालेल्या रुपये ३०,३१,८००/- इतक्या निधीचे वाटप करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : जनगणना-२०१०/१२२४/प्र.क्र.८८/५

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ९ फेब्रुवारी, २०११

पहा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. जनगणना-२०१०/१२२४/प्र.क्र.८८/५, दिनांक-१५/५/२०१०.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. जनगणना-२०१०/१२२४/प्र.क्र.८८/५, दिनांक- ०४/११/२०१०.

**प्रस्तावना :-**

जनगणना-२०११ च्या कामासाठी प्रथमतः अग्रिम म्हणून केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या रु.३,२६,३६,८००/- इतका निधी सर्व संबंधितांना वितरीत करण्याचे आदेश वरील संदर्भ क्र.१ येथील दि.१५.०५.२०१० च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. उपरोक्त निधीपैकी रु.२,९६,०५,०००/- इतका निधी सर्व जिल्हाधिका-यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S.) वर वितरात करण्यात आला आहे. उर्वरित रु. ३०,३१,८००/- (बृहन्मुंबई महानगरपालिकेसाठी रु.२८,९६,८००/- आणि राज्य सरकार (मुख्यालय) साठी रु.१,३५,०००/-) इतका निधी बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S.) उपलब्ध नसल्याने आणि राज्य सरकार मुख्यालयासाठी आहरण व संवितरण अधिकारी घोषित केलेला नसल्याने वितरीत करण्यात आला नव्हता. सदर निधी संबंधितांस वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

२. जनगणना-२०११ च्या कामासाठी प्रथमतः अग्रिम म्हणून केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या रु.३,२६,३६,८००/- इतक्या निधीपैकी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S.) वर अवितरीत राहिलेला रु. ३०,३१,८००/- इतका निधी वरील संदर्भ क्र.१ येथील दि.१५.०५.२०१० च्या शासन निर्णयानुसार वितरीत करण्यात आलेल्या रकमांच्या उद्दिष्टांमध्ये अंशतः बदल करुन सदर रक्कम मागणी क्र. ए ०७-ए, लेखाशीर्ष ३४५४ जनगणना, सर्वेक्षण व सांख्यिकी-०१ जनगणना-००१ संचालन व प्रशासन- ००-०१ जनगणना २०११ (३४५४ ०३४ ९) या खाली पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे उद्दिष्टनिहाय वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्राधिकरणाचे नाव | ०१- वेतन या उद्दीष्टासाठी (रक्कम रुपये) | ५० इतर खर्च या उद्दीष्टासाठी (रक्कम रुपये) | एकूण (रक्कम रुपये) | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | राज्य सरकार (मुख्यालय) | १,३५,००० | --- | १,३५,००० | दि.१५.०५.२०१० च्या शासन निर्णयामध्ये दर्शविलेली रक्कम दरमहा रु.४५,०००/- याप्रमाणे ३ महिन्यांसाठी |
| २ | बृहन्मुंबई महानगरपालिका | २५,५९,३०० | ३,३७,५०० | २८,९६,८०० | दि.१५.०५.२०१० च्या शासन निर्णयामध्ये दर्शविलेली रक्कम दरमहा रु.८,५३,१००/- याप्रमाणे ३ महिन्यांसाठी |
| | **एकूण** | **२६,९४,३००** | **३,३७,५००** | **३०,३१,८००** | |

**जनगणनेसाठी नियुक्त केलेले अधिकारी व कर्मचारी यांना मानधन/प्रशिक्षण यासाठी ही संपूर्ण रक्कम खर्च करावयाची आहे.**

३. बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B.D.S.) व्यवस्था उपलब्ध नसल्यामुळे आणि राज्य सरकार मुख्यालयासाठी आहरण व संवितरण अधिकारी घोषित केलेला नसल्यामुळे त्यांचेसाठी मंजूर करण्यात आलेला निधी वितरीत करण्यासाठी श्री. दि. दा.आढाव, अवर सचिव (कार्यासन २६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच श्री.त्रि.वा.गेडाम, उप सचिव (का.२६) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. बृहन्मुंबई महानगरपालिकेला अदा करावयाच्या रकमेचा धनादेश **<M C G M>** या नावाने काढण्यात यावा.

४. जनगणनेसाठी होणाऱ्या खर्चाची १००% प्रतिपूर्ती केंद्र शासनाकडून होणार आहे. यास्तव, जनगणनेच्या आस्थापनेवरील खर्चाबाबत स्वतंत्र लेखे ठेवावेत व दर महिन्याच्या अशा खर्चाचे एकत्रित विवरणपत्र सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये या कामासाठी प्राधिकृत केलेल्या अधिका-यांच्या स्वाक्षरीनेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई तसेच संचालक, जनगणना कार्यालय, महाराष्ट्र, भारत सरकार, गृह मंत्रालय, एक्सचेंज बिल्डींग, २ रा मजला, सर शिवसागर राम गुलाम मार्ग, बॅलॉर्ड एस्टेट, मुंबई-१ यांचेकडे पाठवून त्याची एक प्रत उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-५), मंत्रालय, मुंबई-३२ यांचेकडे पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावे. तसेच यापूर्वी संदर्भिय शासन निर्णयांन्वये देण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.(१) ८३६/१०/व्यय-४ दिनांक २८/१२/२०१० आणि अनौपचारिक संदर्भ क्र.(२) ०२/११/अर्थ-१४, दिनांक १५/०१/२०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे. (संगणक संकेतांक २०११०२१०१७२२०१००१)

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ० द० जोशी

( अ. द. जोशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त.
सर्व महानगरपालिका आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) (१), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) (२), महाराष्ट्र , नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
वित्त विभाग, व्यय-४/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय शाखा,मंत्रालय,मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग.
सह संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मंत्रालय,मुंबई-३२(२ प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
संचालक, जनगणना कार्यालय, महाराष्ट्र, भारत सरकार, बेलॉर्ड इस्टेट,मुंबई-१
सामान्य प्रशासन विभाग (कार्या.१९), (कार्या. २५) व (कार्या .२६), मंत्रालय, मुंबई
(प्रत्येकी २ प्रती),
निवड नस्ती.

(शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - जनगणना-
२०१०/१२२४/प्र.क्र.८८/५, दिनांक ९ फेब्रुवारी, २०११ चे विवरणपत्र)

**Format**

Treasury : ..........................................

Grant 'A'    CRC Code : ३४५४............................

| Sr. No. | Vr. No. | Nature of bill | Gross Amount | Net Amount |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |

Dy. Collector of Census
Dist : ...................................